शेंद्री ल.पा.तलाव ता.गडहिंग्लज जि.कोल्हापुर
कालव्याच्या अस्तीकरणाचे विशेष दूरूस्ती
अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत

महाराष्ट्र शासन

जलसंपदा विभाग

शासन निर्णय क्रमांकः प्रमा २०१४/( ४७९ /१४)/ सिंव्य(कामे)

मंत्रालय, मुंबई

तारीख: २६ /०८/२०१४

वाचा

कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे पाटबंधारे विकास महामंडळ,पुणे यांचे पत्र क्रमांक मकृखोविम/१६/(७४१ /१४) /प्रशा ४/६३३१ दि.१६.८.२०१४

प्रस्तावना

शेंद्री ल.पा.तलाव सन १९८१ साली स्थानिक नाल्यावर बांधण्यात आला आहे.सदर तलावाची साठवण क्षमता १.८८ दलघमी आहे.सदर तलावास ३.२० कि.मी. लांबीचा उजवा कालवा असुन त्याव्दारे २५५ हे.क्षेत्रास पाणी दिले जाते.या कालव्यावर महाराष्ट्र जलक्षेत्र सुधार प्रकल्पांतर्गत सन २००६ मध्ये पाणी वापर संस्था स्थापन करण्यात आली आहे. सदर कालव्याचे साखळी क्रमाक १४०० मी ते १४६० मी या लांबीतील अस्तरीकरणाचे काम म.ज.सु.प्र. अंतर्गत करुन कालवा पाणी वापर संस्थेस हस्तांतरीत करण्यात आला आहे. प्रस्तुत अस्तरीकरणाचे काम केल्याने कालव्यातुन शेवटपर्यंत पाणी पोहचत आहे. तथापी, विशीष्ट भुस्तर रचनेमुळे कालव्याच्या भरावातुन पाण्याचा पाझर होत आहे. त्याअनुषंगाने सदर कालव्याच्या एकुण लांबीपैकी १७३५ मी.लांबीमध्ये अस्तरीकरण करण्याचे विशेष दुरूस्तीचे काम प्रस्तावित आहे. या सर्व बाबी लक्षात घेता प्रशासकीय मान्यता देण्याचे शासनाचे विचाराधीन होते.

शासन निर्णय

या शासन निर्णयाव्दारे शेंद्री लघु पाटबंधारे तलाव ता गडहिग्लंज जि. कोल्हापूर कालव्याच्या अस्तरीकरणाच्या नियमीत विशेष दुरूस्ती कामास रु. ६०.२३ लक्ष (कामावरील खर्च रु ५४.७६ लक्ष व रु ५.४७ लक्ष अनुषंगिक खर्च) च्या खर्चास खालील अटीच्या अधीन राहुन सोबतच्या परिशिष्टा प्रमाणे प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे

१) अंदाजपत्रकात घेण्यात आलेल्या तरतुदी सक्षम स्तरावर मान्यता घेऊन अंर्तभाव करावा.

२)शासन परिपत्रक क्र.संकीर्ण २००९/(४६५/०९)/मो.प्र-२, दि.१५.०१.२०१० मधील अटींच्या अधिन राहून कामांची दुरुस्ती करण्यात यावी

३) सदरची कामे कार्यारंभ आदेश काढल्यापासून कामे पूर्ण होईपर्यत त्रैमासीक प्रगती अहवाल शासनास सादर करावा.

४). प्रकल्पाचे काम नियोजित वेळेत व प्रशासकीय मान्यतेच्या तरतूदीच्या मर्यादेत पुर्ण करण्यात यावे. ही कामे करण्याकरीता भौतिक व आर्थीक नियोजन करुन कार्यपूर्ततीबाबत विविध टप्यांचे दिनांकासहीत (Mile Stones) निर्धारित करण्यात यावे. सदर दिनांकानुसार miles stone साध्य करणे अपेक्षित असून जर त्यात दिरंगाई झाल्यास दंड (Penalty) आकारण्याची व लवकर साध्य झाल्यास प्रोत्साहन (Incentive) देण्याची तरतूद निविदेमध्ये करण्यात यावी

५) यांत्रिकी संघटनेमार्फत करता येण्यासारखी विशेष दुरुस्तीचे काम यांत्रिकी संघटनेकडून करुन घेण्यात यावे.

६) काम पूर्ण झाल्यानंतर त्याचे पुर्णत्व अहवाल व प्रमाणपत्र (Completion Report & Certificate) शासनास सादर करावे

या कामावर होणारा खर्च ४७०२ लघु पाटबंधारे प्रकल्प यावरील भांडवली खर्च, (योजनांतर्गत) विस्तार व सुधारणा व विशेष दुरुस्ती (१०)(०१ ) महाराष्ट्र कृष्णा खोरे पाटबंधारे विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (४७०२ ७४५२) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्याखाली उपलब्ध होणाऱ्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिंव्य(कामे) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र ४३ सन २०१४-१५ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे.

हा शासन निर्णय (वित्त विभाग) क्र विअप्र १०.०८/प्रक्र ७०/२००८/विनियम, दि.१५.५.२००९ मधील भाग-पहिला उपविभाग -३ मधील अ.क्र.४( २७ (२) मध्ये विहित केल्यानुसार अनावर्ती खर्चाच्या बाबतीत रु ५.०० कोटीपर्यत प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार संबधित विभागास प्रदान केले आहेत. त्या अधिकारानुसार आंतर वित्तीय सल्लागाराच्या सहमतीने हे आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२७१९२०३७१०२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Yashavantrao Kashinath Bhadane

Digitally signed by Yashavantrao Kashinath Bhadane
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Yashavantrao Kashinath Bhadane
Date: 2014.08.27 19:20:48 +05'30'

(य.का.भदाणे)

शासनाचे अवर सचिव

प्रत,

१. महालेखापाल १/२(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,

२. महालेखापाल १/२(लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,

३. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन,मुंबई

४. मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन,मुंबई

५. मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई

६. मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई

७. स्वीय सहायक, मा. मंत्री, जलसंपदा (मकृखोविम वगळून), मंत्रालय, मुंबई,

८. स्वीय सहायक, मा. मंत्री, जलसंपदा (मकृखोविम), मंत्रालय, मुंबई,

९. स्वीय सहायक, मा. राज्यमंत्री, जलसंपदा, मंत्रालय, मुंबई,

१०.स्वीय सहायक, प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई

११.स्वीय सहायक, प्रधान सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई

१२.कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे पाटबंधारे विकास महामंडळ, पुणे

१३.मुख्य अभियंता(पा) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,

१४.मुख्य अभियंता, (यांत्रिकी) जलसंपदा विभाग, नाशिक

१५. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, पुणे

१६.आंतरवित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई

१७.माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई

१८.उप सचिव, (सिंव्य), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,

१९.अधीक्षक अभियंता,सांगली पाटबंधारे मंडळ, सांगली

२०.अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ(व्दारे), पुणे- १

२१.अवर सचिव (सिंव्य/कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,

२२.कार्यकारी अभियंता, मुख्य व्दार उभारणी पथक क्र ५, नाशिक

२३.उप अभियंता, सिंव्य(कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,

२४.ग्रंथालय, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,

२५.सिंव्य(कामे)/कार्यासन, संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक प्रमा २०१४/(४७९ /१४)/ सिंव्य(कामे) दिनांक  २६.०८.२०१४ चे प्रपत्र

परिशीष्ट

| अ.क्र | कामाचे नांव | अंदाजीत खर्च (लक्ष रुपये ) |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १) | शेंद्री लघु पाटबंधारे तलाव कालवा अस्तरीकरणाची कामे | ५४.७६ |
| | **एकूण** | ५४.७६ |
| | अनुषंगिक खर्च १० टक्के | ५.४७ |
| | **एकूण** | ६०.२३ |

Yashavantrao Kashinath Bhadane

Digitally signed by Yashavantrao Kashinath Bhadane
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Yashavantrao Kashinath Bhadane
Date: 2014.08.27 19:21:18 +05'30'

(य.का.भदाणे)

शासनाचे अवर सचिव